# अस्तित्व

**-- चं.प्र.देशपांडे.**

मराठी रंगभूमीची परंपराही आहे आणि आपणही आहोतच. परंपरा जपावी -- तीतून चालावं हेही खोटं नसेल.नवीन काही असलं की त्याचे बापजादे कुठल्यातरी फर्मास देशात सापडणं शक्य असतं -- कित्येकांना. अंधानुकरण हा शब्दच मुळी वाईट अर्थाचा, तेव्हा ते वाईट हे पुन्हा सांगण्याची जरूरी नाही. तरी या सगळ्या गदारोळातून एकदा झक्कपैकी अंग झटकून कान फडकावून एक आळोखापिळोखा ठेवून दिला की पाहाणं तसं अवघड नाही. शिष्टपणानं डोस द्यायचा उद्देश नाही. सांगणं एवढंच की वास्तवता -- अमुक -- मनाला पटणं -- तमुक वगैरे गोष्टी जरा -- थोड्या तासून छाटून घेतल्या तर नाट्याचं एक प्रचंड विश्व खुलं होतं. त्याला का मुकावं ? तर मुकू नये. कदाचित आपल्यातला जो ' कळणारा -- पटणारा ' वाला आहे त्याला ते ' अनाकलनीय ' वाटेल. वाटे ना. त्यासाठी नाट्याला का मुका ? कसलंही, कुठलंही नाटक हे निदान -- निदान करमणूक तरी करतंच. करमणूक म्हणजे तरी काय ? जे पाहात -- ऐकत राहावं वाटत असेल ते तसं करत राहाणं -- दुसरं काय ? आणि ते तथाकथित ' अनाकलनीय ' निरर्थक असेलच असं कशावरून ? आपल्या कळण्या -- पटण्याच्या कल्पना तासल्या की आपल्या आयुष्याचं एक वेगळं, विस्तृत रूप आपल्याला दिसू शकण्याची शक्यता तरी निदान फाडदिशी अमान्य का करा ? आणि नाट्य आणि अर्थ यांची फारकत तरी कशाला ? जिथं नाट्य आहे तिथं अर्थ आहेच. तर एवढं पुरे. तुम्ही -- आम्ही म्हणजे आपण इत्यादी सगळे आहोत--आहोतच. म्हणूनच ही एकांकिका. नाव आहे 'अस्तित्व.'

( कुठल्यातरी भिंती. समोर उजव्या बाजूला आत यायचं -- किंवा अर्थातच बाहेर जायचं -- दार. डाव्या बाजूला गोलमेज परिषदेचं असावं तसं प्रचंड गोल टेबल. भोवती खुर्च्या, उजवीकडं पुढं छोट्या स्टुलावर पाण्याचा माठ -- त्यावर टोपीसारखा ग्लास. खाली पाणी फेकण्यासाठी छोटी बादली.

पन्नाशीच्या पुढचा करड्या सुटातला गृहस्थ प्रवेश करतो. याला मिशाही असाव्या. येतो. भलताच मग्नातुर. थोडा वेळ उभा राहातो. मग माठाकडे येतो. हळूच नळावर हात ठेवतो. तो सोडतो. बादलीत पाण्याची धार. काही क्षण. ऐकतो. बंद करतो. ताठ होतो आणि एकदम माठाकडे, वर, खुर्च्यांकडे वगैरे माना वेळावत प्रचंड क्रूर हसू लागतो. एकदम थांबतो. शांतता. त्याला वडील म्हणू.)

वडील : तर हे असं आहे.जितका मोठा आवाज तितकी शांती मोठी.सन्नाटा मोठा--आव मेरे बेटे -- बेटे लोग ! -- ( एक तरुण प्रवेश करतो. गबाळा. मळक्या चेहऱ्याचा.गोंधळल्यासारखा -- बावरा.)

तरुण : मी -- मी --

वडील : ( अत्यंत उत्साहानं ) ओह ! ये ये ! काय -- प्रणयिनी काय म्हणतेय तुमची ! अं --

तरुण : ( गबाळं हसून ) हं ! चांगलीय.

वडील : असं ना -- लब्बाड -- वाह -- बस -- हं. कुठं बसतोस -- तिथं -- नको. नाहीतर थांब -- तुला हा माठ सगळ्यात आवडतो -- अं -- तर -- मी -- ( टेबलाजवळची खुर्ची घेऊन येत ) तुला इथंच देतो खुर्ची -- माठाजवळ -- अं -- काय -- बस -- ( तरुण बसतो.) छान ! माठ आवडतो ना तुला ?

तरुण : हो पण मी तिथं -- ( टेबलाकडं बोट )

वडील : बस रे. तर विषयाला सुरुवात. मी तुझा बापही असेन. निदान एक वडील माणूस तरी आहेच. अं --

तरुण : माझ्या लक्षात येत नाहीय --

वडील : ( खुर्च्यांकडं जाऊन ) अहो -- कसं येईल लक्षात त्याच्या ? -- इंपॉसिबल -- बघा तर -- ( परत येऊन ) येईल रे हळूहळू --अं -- हं -- आता मी सांगेन ते करशील ना ?

तरुण : मला भीती वाटते.

वडील : अरे हट् ! भीती वगैरे कधी नसतेच मुळी. आपल्याला वाटतं तसं -- माझं ऐक.

तरुण : अं ?

वडील : माझं ऐक तू -- काय ?

तरुण : अं ? हो - हो, ऐकतो. नाही म्हणजे ऐकेन की !

वडील : ( माठाच्या नळावर हात ठेवत ) याच्याखाली हात धर -- ( तो तसं करतो.) छान -- ( नळ सोडून ) आता
तुझ्या हातावर पाणी पडतंय.

तरुण : हो --

वडील : हो नाही. मी सांगेन ते म्हण ! म्हण, ' तू सांगशील तसं पुढची सूचना देईपर्यंत न हलता बसून राहीन '-- म्हण.

तरुण : मी सांगेन तसं तू --

वडील : नव्हे -- तू मला सांगतोयस असं --

तरुण : तू मला सांगतोयस असं --

वडील : अरे ! तू मी म्हणतो तसं म्हण बरं -- हं म्हण -- ' तू -- सांगशील तसं -- पुढची सूचना देईपर्यंत -- न हलता -- बसून राहीन ' ( तो तसतसं म्हणत जातो. ) हं. ठीक.( -- हे नळ बंद करून. ) मांडी घाल. ( तो घालतो.) खुर्चीच्या हातावर तुझे हात ठेव -- ( तो ठेवतो. ) असं बसून राह्यचं. बांधला गेलास तू. जायबंदी. ( खुर्च्यांकडं पाहून मोठ्यांदा हसतो -- मग एकदम पवित्रा बदलून ) नेभळट उंदीर आहेस तू ! नादान ! बेअक्कल ! बुद्दू !

तरुण : अहो अहो -- असं -- नाही म्हणजे भिववताय का मला -- मी --

वडील : भिववत नाहीय -- बेमुर्वत दिवाळखोर -- ठार ठार ठार -- ( हसयला लागतो.)

तरुण : अहो, कृपा करून असलं काही करू नका - स्थितीतून सोडवा मला -- मी -- माझा कसलाही त्रास --

वडील : त्रास ? पैज जिंकलीय पैज ! मारतोस, तू पण ? चल ! मार पैज. हुं ! तू कसला पैज मारणार -- मेलायस तू -- मेलायस म्हणजे मेलेला आहेस-- असं नाही -- तू नव्हतासच -- तू कधीच नव्हतास -- नाहीस -- नाहीसच -- तू नाहीच आहेस.

तरुण : अहो -- पण हे -- असं काय बघताय -- मी -- मी --

वडील : तू ? हुं : ! बघशील आता. सगळे येतील. तेव्हा बघ. बघशील म्हणजे बघणारच नाहीस -- नसलेला तो काय बघणार ! ( स्वतःवरच चिडून ओरडतो ) ' नसलेला तो '? नसलेला तो ? बोल -- कोण -- ( किंचाळतो ) कोण ? -- ( खाली येत ) लक्षात ठेव. तू नव्हतास -- नाहीयस -- कधीही असणार नाहीस -- म्हणजे एकटाच बोलतोय मी या इथं --एकटा --( ओरडतो ) एकटा !( त्यातूनच हसू लागतो. थांबून ) बघतोयस काय असा भांबावून ! जणू काय असल्यासारखा भितोय -- नादान ! जायबंदी -- हलू नाही शकत तू -- हलू शकत नाहीस -- नाहीस तू --नाहीसच --

तरुण : ( चक्रावून ) म् -- म्हणजे काय -- करणार आहात तरी काय तुम्ही मला ?

वडील : तुला ? हुं : ! नसलेल्याला काय करायचंय. मूर्ख ! नसलेल्या तुला घेऊन काय करायचंय -- कोण काय करणार आहे ते -- कुणाला कुठं -- म्हणे ' काय '।

तरुण : अहो पण मी आहे. हा काय ! असं का करताय तुम्ही ? ...म-माझ्याशीच तर --

वडील : चूप ! बडबड बंद ! जे काय असेल तेच होईल आता इथं -- सगळे -- ते -- मी -- हुंः !

तरुण : क्षमा मागतो मी तुमची -- म -- माझा काहीही उद्देश नाही -- फक्त तुमच्यात यायचं होतं मला -- तिथं -- मला -- म्हणजे खरंच -- वेडाबिडा नाहीय मी --खरंच --

वडील : तू काहीच नाहीयस -- धोकेबाज -- वेडा ? हुं : !

तरुण : नाही -- खरंच वेड नाही -- म्हणजे मी --

वडील : वेड--वेड-- वेड-- वेड-- वेड-- वेड-- वेड ।।।।। बंद ।

तरुण : प -- पण -- ( तोंड मिटतो. कातर नजर.)

वडील : ती मुलगी हेच वेड आहे -- निर्लज्ज -- नग्न -- ते लागलंय तुला -- खोल -- कोण कुठून आलीय कोण जाणे -- हलकट -- तू -- तू -- तू --

तरुण : पण म्हणजे -- ती -- प्रणयिनी --

वडील : प्रॅणॅयिने !

तरुण : ती -- ती स्वतःहूनच येते -- मी -- मी फक्त --

वडील : तू फक्त ! हुं : ! फक्तसुध्दा नाहीयस तू -- फक्त ! -- फक्त -- फक्त --

तरुण : मला वाटलं नव्हतं, तुम्ही असं फसवाल -- का -- का असं --

वडील : फसवाल ! कोण फसवाल -- तू -- तुला -- ? मस्तवाल ! आरोप करतोय नादान ! बघशील -- हुं :-- पण तू काय बघणार म्हणा -- ( खांदे उडवतो.) पण इतक्या झटपट सगळं जमून येईल असं वाटलं नव्हतं मला -- मलाच माहिती होतं. मीच ठरवलं होतं. पैज मारली होती स्वतःशीच -- आता सगळ्या जगाला कळेल -- सगळ्यांना कळेल. जाहीर -- हा नाहीच -- नव्हता -- नसेल -- कुलक्षणी दिवटा -- ( बाहेरून व्हयोलिनचा आवाज ऐकू येतो. विकृत वादन.) हां ! हे आमचे वादक आले --( वाजवतच वादक प्रवेशतो. पोशाख चमत्कारिक. डोक्याला फडकं गुंडाळलेलं. त्यात उंच उंच अशी तीनचार पिसं खोवलेली. गळ्यात कागदी फुलांचा हार.) या, वादक, या ! ( वादक तसाच वाजवून दाखवत राहतो.) वा वादक वा ! काय कसं काय ! ( तो अजून वाजवून दाखवतोय -- तोंड उघडं -- नजर, ओठ, मान वगैरे हलवून त्या गतीला साथ ) बस्स ! पुरे वादक. छान ! वादक असावा तर असा ! वा ! भले पठ्ठे ! अं ? अं ? अं हं ।। वा ! वा वा, वा वा, छान -- बस्स ! ( तो अजून वाजवतोय.) बस्स, पुरे ! ( हसून ) छान, -- पुरे आता -- अं -- ( अजून वाजवतोय.) ए वादक, ( ओरडतो ) वादक !! ( वादक जणू आता गत संपत आलीय अशा माना व चेहरे बदलतो आणि शेवटी दोन - तीन टप्प्यांनंतर ' हो ' करून थांबतो ) बेअकली !

वादक : अं ? हं. बेअकली. हे आपण कोणाला म्हणालात ?

वडील : तेही समजण्याची अक्कल नसलेल्याला ! मूर्ख !

वादक : ते असो. आता ' मूर्ख ' हे कोणाला म्हणालात ?

वडील : तुझ्या बापाला !

वादक : आमचे बाप ? हं. ते वारले. पण वारल्यामुळे ते मूर्ख कसे काय ठरतात ? ( तरुणाकडे बघतो.)

वडीलः : चालता हो इथून.

वादक : अं ? हा गृहस्थ असा का बसला आहे ?

वडील : ( पारा उतरवून ) अरे, तेच तर सांगत होतो मी !

वादक : नाही. तुम्ही ते सांगत नव्हतात. आमच्या बापांबद्दल सांगत होतात. ते असो. हे गृहस्थ भयग्रस्त दुःखी दिसतात ! आणि हे पायांना मुंग्या आल्यासारखे का बसलेत ? की यांना बध्दकोष्ठनिवारक धून सुनवू ?

तरुण : मला -- मला डांबून ठेवलंय त्यांनी -- विनाकारण --

वडील : ए वादक, इकडं ये, मी सांगतो तुला.

वादक : कुठं ?

वडील : इकडं ये.

वादक : कुठं डांबून ठेवलंय ? दिसत नाही ते !

तरुण : तीच युक्ती केलीय त्यांनी !

वादक : काय हो, कोणती अशी युक्ती तुम्ही केलीत की --

वडील : इकडं ये.

वादक : कुठं ? हं. हा आलो.

वडील : इकडे या बाजूला ये-- ( टेबलकडे जातात.) इथं बस.( वादक खुर्चीवर बसतो. ते स्वतः त्याच्या शेजारच्या खुर्चीवर बसतात.) कान इकडे कर. ( तो तसं करतो. ते त्याच्या कानात काहीतरी सांगू लागतात आणि तो हसू लागतो.) हसतोयस का ?

वादक : गुदगुल्या होतायत. पण सांगा. ( ते पुन्हा सांगू लागतात. थोडं थोडं हसत हसत तो ते ऐकून घेतो.) अच्छा ! ये बात है ! ( तरुणाकडे येऊन ) अहो सद्‌गृहस्थ, हे आहे हेच बरोबर आहे -- जादा बतावणी कराल तर ब. को. नि. धून वाजवीन -- हां ! तुम्ही निर्लज्ज आहातच पण शिवाय ते स्वतःला माहीत नसल्याचं दाखवता -- तर तुम्हाला हीच शिक्षा बरोबर आहे !

तरुण : शिक्षा ! काय म्हणून शिक्षा ? मी खरंच म्हणजे --

वडील : ए वादक, इकडे ये तू -- त्याला शिक्षाबिक्षा काही नाहीय. तोसुध्दा नाहीय तर त्याला शिक्षा कसली -- इकडं ये --

वादकु : बरोबर आहे. मी तिकडंच येतो. हे सद्‌गृहस्थ नाहीच आहेत तर त्यांच्याशी बोला का !-- तर तुम्ही असेच या खुर्चीतच नसा-- आम्ही तिकडे बसून आहोत ! ( तो टेबलाकडच्या खुर्चीवर जाऊन बसतो. वडील

अर्थात जवळच. ) तुम्ही वडीलमाणूस !

वडील : जाऊ दे ! पटलंय ना तुला -- पुढचं मी पाहातो -- तू आता बोलण्यापेक्षा तुझं ते हे वाजवत बसलास तरी चालेल.

वादक : ( व्हायोलिन दाखवत ) हे ?

वडील : हं.

वादक : मघाशी आपण हे वाजवू नको म्हणलात -- आता वाजव म्हणता -- हे कसं काय ?

वडील : जाऊ दे रे, तुझ्यासारख्या वादकाला बोलण्यापेक्षा वादन बरं.

वादक : खरं ? ( उत्साहानं ) ही सुरुवात. ( रात्रीच्या वेळी कुत्रं रडत असल्यासारखे सूर मोठ्या तन्मयतेनं काढत राहातो. वडील बसून. तरुण चक्रावून पाहात.)

वडील : ( थोड्या वेळानं वैतागून ) ए वादक, तू नुसता जर बसू शकत असशील तर हे थांबव !

वादक : ( थांबवून ) नुसता म्हणजे कसा ?

वडील : म्हणजे न बोलता आणि न वाजवता.

वादक : न वाजवता बसू शकेन पण मग निदान मनातल्या मनात तरी मला बोलत हे राहावंच लागेल.

वडील : तसं चालेल. आवाज आला नाही कसलाही म्हणजे झालं.

वादक : पण मनात बोलताना मला ते ऐकू हे यायलाच हवं की नाही ?

वडील : तसं चालेल. आम्हाला -- म्हणजे मला ऐकू आलं नाही म्हणजे झालं.

वादक : पण तुम्हीच मनातल्या मनात मी काही तरी बोलतोय असं समजून ऐकण्याची शक्यता --

वडील : तसं चालेल रे -- आणि मी तसं करणारच नाही.

वादक : पण तुम्ही तसं केलं की नाही ते कळायला काय मार्ग ?

वडील : ( चिडून ) बरं वाजव ! वाजव ! नादान एकेक ! हुं !

वादक : ( हसून ) आभार ! ( पुन्हा तीच धून नव्या उत्साहानं सुरू करतो. वडील वैतागत बसून. मधेच उठून येरझाऱ्या. तरुण चक्रावलेला. थोड्या वेळानं शास्त्रज्ञ प्रवेश करतो. सुटाबुटात. वैचारिक जागरणवाला दिसावा.)

शास्त्रज्ञ : ( प्रवेशून तरुणाकडं येत ) काय तरुण ! कसं काय !

तरुण : अं ? अहो कृपया त्यांना जरा सांगा हो --

शास्त्रज्ञ : अं ? काय ?

वडील : हॅलो शास्त्रज्ञ ! इकडं या, इकडं या ! मी सांगतो तुम्हाला.

शास्त्रज्ञ : ( गोंधळून ) अं ? काय प्रकार काय ?

वडील : यशस्वी ! जिंकलं ! इकडं या सांगतो.( शास्त्रज्ञ तरुणाकडं चमत्कारिक दृष्टीनं पाहात जातो -- तसं पाहातच ऐकत राहातो.) अहो तो नाहीच आहे. ही इज जस्ट अ नॉट.( मग नुसती हावभावातून चर्चा. मग शास्त्रज्ञाचा पटल्यासारखा चेहरा.) कळलं ना -- असं आहे हे --

तरुण : अहो शास्त्रज्ञ -- तुम्ही तरी --

वडील : आपण लक्षच द्यायचं नाही. ओरडू दे.

शास्त्रज्ञ : खरोखर तुम्ही एक फार चांगलं कृत्य केलं आहे. समाज तुमचा कायमचा ऋणी राहील.

वडील : अहो एकट्याचं का काम आहे हे--सहकार्यानंच होतं हे ! बरं ते असो. बसा. काय नवीन संशोधन वगैरे ?

शास्त्रज्ञ : चाललंय. यश मिळेल तेव्हा क्रांतीच होईल एक !

वडील : म्हणजे ?

शास्त्रज्ञ : म्हणजे असं. आपल्याला जे अनुभवापासून ज्ञान मिळतं त्यात एक संगतवार घटनाक्रम असणार. बाहेरच्या लहरी शरीरात -- म्हणजे मेंदूकडं जात असणार. आणि ते ज्ञान एका विशिष्ट ठिकाणी मुद्रित होत असणार. या प्रक्रियेचा आम्ही शोध घेत आहोत. अर्थात हे तुम्हाला मी थोडक्यात सांगितलं. त्यात आणखी बरेच उपप्रश्न आणि बाजू आहेत. पण जेव्हा हे पुरं होईल तेव्हा ज्ञानाच्या रेकॉर्डस निघतील. आणि त्या मुद्रित ज्ञानलहरी मेंदूत सोडण्याची सोय होईल. मेंदूची क्षमता वाढवण्याचे मार्ग सापडतील. आणि मग शाळा, शिक्षक, प्राध्यापक वगैरेंची जरूरच लागणार नाही. यंत्रात डोकं ठेवलं की एकेका वेळी एकेका विषयाचा प्रगाढ पंडित करता येईल प्रत्येकाला. सगळी मानवजात प्रचंड ज्ञानी होऊन जाईल. मानवाचं अस्तित्व प्रचंड होईल. सबंध जग महाप्रचंड होऊन जाईल.

वडील : वा वा वा ! फार महान कार्यात आहात तुम्ही -- तुम्हाला सुयश चिंतितो. पण काय हो --( काहीतरी विचारणं. शास्त्रज्ञानं उत्तर देणं. चर्चास्वरूप. धोतर, लांब कोट, मिशा, टोपी -- असे मास्तर प्रवेश करतात. सज्जन -- प्रेमळ मूर्ती. )

तरुण : नमस्कार सर.( अर्थात नुसतं तोंडानंच )

मास्तर : नमस्कार नमस्कार -- आणि काय रे हात जोडले असतेस तर काय झडले असते का ते ? अं ? आळस वाईट -- हं !

तरुणः : नाही सर, त्यांनी मला असं बसवून ठेवलंय. शपथेवर -- उठू शकत नाही मी -- हलूही शकत नाही -- सर शाळेत होतो तेव्हा खूप प्रेम केलंत --अजूनही तुमचा आशीर्वाद नेहमी आम्हा विद्यार्थ्यांच्या पाठीशी असतो -- त्यांना सोडवायला सांगा सर मला -- कृपा करा -- ( काकुळती. )

मास्तर : हा काय प्रकार ? -- ए S ( वादकाला ) बंद कर ते ! ( बंद. ) काय आहे काय हे ?

वडील : इकडं या मास्तर --

मास्तर : काय म्हणून ? -- मोठ्यानं सांगा काय ते -- माझ्या विद्यार्थ्याला तुम्ही --

वडील : मास्तर -- म्हणजे काय आहे की तो तुमचा विद्यार्थी नाहीच आहे !

मास्तर : खोटं बोलू नका. खोटं बोलू नका. वय झालं तरी स्मृती पक्की आहे माझी. खोटं बोलणं चांगलं नव्हे. घातक आहे ते. लक्षात ठेवा.

वडील : हो, पण तसं नव्हे--म्हणजे मला जरा वेगळंच म्हणायचं होतं -- म्हणजे तो तुमचा तसा विद्यार्थी असेल --

मास्तर : आहेच !

वडील : हो आहेच -- पण गोष्ट अशी आहे की तो अस्तित्वातच नाही.

मास्तर : वेडा समजू नका मला. फार थट्टा चांगली नव्हे.

शास्त्रज्ञ : मास्तर, हे म्हणतायत ते खरं आहे -- आम्ही नीट काय ते सांगतो तुम्हाला -- इकडं या --
( मास्तर विचारात. जातात. बसतात. वडील व शास्त्रज्ञ दोघे मिळून त्यांना काही समजावून देतात. वादक ऐकत ऐकत माना हो -- नाही अशा डोलावत राहतो. मास्तरांना हळूहळू पटत जातं. तसतसा तरुणाचा चेहरा पार खलास होत जातो. शेवटचा आधार तुटत असल्यासारखा.)

मास्तर : अस्सं ! मग बरोबर. फोडून काढायला हवा त्याला. निर्लज्ज ! पण नाही -- तो नाहीच आहे तर फोडायचं काय ! ( माना डोलावतात.) फक्त आपणच -- इथं -- म्हणजे -- अं ?

वडील : हो -- हो. बरोबर.

शास्त्रज्ञ : हो -- हो. बरोबर.( मग ते बोलत बसतात. नंतर हळूहळू एकेक माणूस येतो. तरुणाशी बोलतो. त्यानंतर वा त्याआधीच कुणीतरी प्रत्येकाला बोलावतं. समजावून दिलं जातं. एकूण दहाबारा माणसं जमतात. एकदोन बायकाही. सगळ्यांना तरुण नसल्याचं पटलं आहे. तरुण नुसता खचल्यासारखा बसून. इतर काही बोलतात -- हसतात -- मध्येच वादक वाजवतो. असं थोडा वेळ.)

तरुण : अहो, मला तहान लागलीय --( एखाद--दुसरा नुसतं बघून पुन्हा दुर्लक्ष करतो.) घशाला कोरड पडलीय माझ्या -- पाणी हवंय मला -- पाणी....( ओरडतो ) पाणी ! ( पण त्यामुळं घशाला आणखीनच त्रास होतो. थांबतो.)

वडील : ओरडू नकोस फुकट -- नसलेला उंदीर !

तरुण : ( पुन्हा ओरडायचा प्रयत्न ) पाणी हवंय मला -- तहान लागलीय तहान !

शास्त्रज्ञ : चूप. नसलेल्याला कसली तहान !

मास्तर : पुन्हा पुन्हा ओरडू नकोस.

तरुण : तुम्ही ठार मारणार आहात मला ? का ?

वडील : ( माणसांना ) अहो ओरडू दे -- त्याचं ओरडणंही नाहीच आहे -- चला --( पुन्हा गप्पा -- हास्यविनोद सुरू. मधेच एकदोघं जण पत्त्यांचे जोड काढतात. पिसून वाटतात. खेळायला लागतात. हसत खिदळत.)

तरुण : ( रडवेला होत )मारू नका हो मला -- मारू नका -- कृपा करा -- ( पण कुणी लक्ष देत नाही.) दया करा
माझ्यावर -- खरंच -- मला मरायचं नाहीय -- खरंच -- तहान लागलीय मला -- कोरड...( कुणाचंही लक्ष नाही.) माझे पाय दुखायला लागलेत -- ( ओरडतो ) पाणी हवंय मला पाणी !( त्यांचं आपलं तसंच चालू, बेदखल.) पाणी--पाणी--पाणी--पाणीS!( थबकतो. हुंदका देतो. थोडा वेळ असाच. मग --) ठीक

आहे. मी नाही आहे. ठीक अहे -- मी नाही आहे -- ठीक आहे -- दाखवून देतो -- दाखवून देतो -- कोण आहे आणि कोण नाही -- मी नाही आहे ? ठीक आहे -- देतो दाखवून -- तुम्हालाही कधीतरी तहान लागेलच -- बघू या -- मरेन -- पण दाखवून देईन-- दाखवून देईन -- या आता एकएक -- एकएक -- ( एक मनुष्य टेबलावर पानं ठेवून हसत उठतो. माठाच्या दिशेनं येतो. तरुणाकडं पूर्ण दुर्लक्ष. आणि ताडकन तरुण उठतो.) चालेल -- मेलो तरी चालेल --( त्या माणसाचा गळा दाबतो. तो मनुष्य मरून पडतो. तरुण जोरात ष्वासोच्छ्वास करत उभा --) मी नाही आहे काय -- ठीक आहे -- या एकेक --

(अशी एकएक माणसं येतात. तरुण प्रत्येकाला गळा दाबून ठार करतो. सगळे मरून पडल्यावर -- आपल्या पायांभोवती पसरलेल्या प्रेतांकडे पाहात ) मी नाही आहे -- खरं आहे. ठीक आहे -- नाही आहे -- म्हणे -- होय, तुम्हीच आहात. फक्त तुम्हीच - ( बघतो. माठाकडं जातो. ग्लास हातात घेतो -- नळ सोडून ग्लास भरू लागतो -- धारेचा आवाज...एकदम अंधार. आवाज चालूच. पुन्हा प्रकाश पडतो तेव्हा रंगभूमीवर प्रेतांचा खच नाही. फक्त तरुणाचं प्रेत पडलेलं आहे आणि प्रणयिनी ग्लास भरते आहे. ग्लास भरल्यावर ती नळ बंद करते. काही क्षण. शांत, धीरगंभीर, स्नेहल हालचाली. काही पावलं टाकून संथपणे तरुणाच्या प्रेताजवळ येते. पाहात काही क्षण उभी. मग,शांत, गंभीर स्मित.)

प्रणयिनीः मी प्रणयिनी...

( शांतता. तरुणाच्या पायांवर पाण्याची धार धरते. तिथून सुरू झालेली ती धार तशीच सांडत संथ पावलं टाकत दुसऱ्या बाजूला निघून जाते. काही क्षण. मग अर्थातच ...)

... पडदा पडत जातो ...



पत्ता -चं.प्र.देशपांडे,
३, स्नेहदीप अपा.
चिंतामणीनगर,
सहकारनगर नं.२, पर्वती,
पुणे - ४११ ००९.

( दूरध्वनी - ४२२ ७८४७ )